गत अध्यायात विधीलिखितांची चमत्कृतीपूर्ण, रोमांचित करणारी, अशक्यप्राय वाटणाऱ्या अशा परस्परालंबी घटनांची शृंखला पहावयास मिळाली, गोरक्ष आणि चौरंगीशी लढतांना शिवपुत्र, वीरभद्राचा मृत्यु! त्यानंतर श्रीशिवाचा विलाप पाहून गोरक्षनाथांनी त्याला पुनश्च जिवंत करणे, तहत बारा वर्षे काशी नरेश त्रिविक्रमाच्या देहात वास करून राहणाऱ्या मच्छिंद्रनाथांच्या आत्म्याचे स्वदेहात पुनरागमन, त्यामुळे त्रिविक्रमाचे अपरिहार्य निधन. त्याच्या अंत्ययात्रेला तिन्ही नाथांची उपस्थिती. त्रिविक्रमपुत्र धर्मराजाला आपल्या पितृत्वाचे रहस्य मातेकडून समजणे, धर्मराजाने आपल्या स्वपुत्राला गादीवर बसवून स्वतः नाथपंथाची दीक्षा घेणे, गोरक्षनाथांनी माणिक नावाच्या शेतकऱ्याला त्याच्या नकळत तपश्चर्येला बसविले होते. त्याची मुक्ती मच्छिंद्रनाथांच्या उपस्थित करून त्याचे अडबंगनाथ म्हणून नाथपंथात स्थान निर्माण करणे, अशा घटनाक्रमाच्या रसाळ मांडणीतून भाविकांच्या रसपरिपोष निश्चित झाला आहे. आता गत अध्यायातील रेवणनाथाची आणि श्री दत्तगुरूंची झालेली भेट आणि केवळ श्रीगुरूंच्या दिव्य स्पर्शाने आणि सिद्धमंत्रामुळे त्यांच्यात झालेला आध्यत्मिक बदल, त्याच्या आत्मिक उन्नतीचे कथन आपण जाणून घेणार आहोत.

हिऱ्याचे अस्तित्व गारगोट्यांमध्ये मिसळले तरी ते हिरकणीच्या माध्यमातून सिद्ध होते. राजहंसांला पिंजऱ्यात कोंडले तरी तो मोत्याच्या चाऱ्याशिवाय काही खात नाही. लोहचुंबकाच्या संपर्कात आलेले लोहकण आपोआप चुंबककडे आकर्षित होतात. त्याच न्यायाने रेवण श्रीदत्तगुरूंच्या संपर्कात आला होता. दुधात साखर पडावी तसेच झाले पण किशोरावस्थेतल्या अपरिपक्वतेमुळे केवळ सिद्धी प्राप्तीवर संतुष्ट होऊन त्याने श्रीदत्तगुरूंना जाऊ दिले. बालकाची चणेफुटणे देऊन समजूत काढावी तसे दत्तात्रेयांनी रेवणला अल्पसल्प भेटीदाखल देऊन खुश केले होते.

श्रीदत्तगुरूंच्या साक्षात्कारी स्पर्शाने पावन झालेल्या रेवण शेतात गेला आणि औताला बैल जुंपून त्यांची मशागत सुरु केली, हातात कासरा धरून गाणे गात औतामागे फिरू लागला, तो गात असलेले गाणे म्हणजे शेतकरी गातात ते गीत नव्हते तर गुरुदत्तांनी कानात सांगितलेल्या सिद्धमंत्राचे गाणे रेवण गुणगुणत होता, त्यामुळे महिमा त्याच्या समोर प्रकट झाली आणि औतजवळ जाऊन त्याला म्हणाली, “स्वामी! हुकुम करा काय मनोकामना आहे?” रेवणने विचारले, “देवी! आपण कोण? आपले नाव सांगावे.” “माझे नाव महिमा सिद्धी आहे” असे उत्तर तिने दिल्यावर याच्या डोक्यात प्रकाश पडला. “मंत्रकाव्यात उल्लेख असलेली आणि श्रीदत्तगुरूंनी सांगितलेली हीच ती महिमा सिद्धी!” रेवणला श्रीदत्तगुरूंचे बोलणे आठवले, सिद्धी देतांना त्यांनी सांगीतले होते, “हा मंत्र पठाण केल्यास तुझ्यापुढे साक्षात ‘महिमा’ प्रकट होईल. तुझी जी काही इच्छा असेल ती तिच्याकडून मागून घे, धन, धान्य, संपत्ती तुला देऊन ती तुझे मनोरथ पूर्ण करील. तिचा प्रताप काय आहे म्हणून विचारशील तर काय सांगावे! भूलोकातील सर्व वैभव देईल, अरण्यातील सर्व वृक्षांचे कल्पवृक्ष करील. दगडांच्या खाणींचा परीसात किंवा चिंतामणीत रुपांतर करून देईल. वस्त्र, सुवर्ण, अलंकार यांचे पर्वत उभे करील. थोडक्यात तू जी कामना करशील ती पूर्ण करण्यास ती समर्थ आहे.” त्यावेळी रेवणला अतिशय आनंद झाला होता पण रेवण हा प्रांजळ आणि निस्वार्थी असल्याने तो कोणत्याही अपेक्षेने मंत्र गायन करीत नव्हता पण वरदानाप्रमाणे प्रत्यक्ष सिद्ध देवता प्रकटल्याचे पाहून त्याला श्रीदत्तांच्या बोलाची सत्यता समजली. मनात म्हणाला, “गुरुदेवांनी सुपंथाची दिशा दाखविली आहे.” हातातले औत सोडून सिद्धीला म्हणाला, “इथपासून त्या तिथे पलीकडच्या झाडापर्यंत माझे शेत आहे, हे संपूर्ण शेत एका क्षणात सुवार्णराशींनी भरून दाखव, असा चमत्कार केलास तर मी ‘तू

सिद्धी आहेस' हे मान्य करेन या परीक्षेला उतरलीस तर मग मी माझ्या मनोकामना सांगेन. राजहंसाची सत्यता कशी पटते! तर तो पाणी मिश्रीत दुधातून फक्त दूधच प्राशन करतो. तद्‌वत या शेतातील वाळूमातीचे सुवर्ण केल्यास तुझी परीक्षा होईल. तेव्हा आता माझ्या मनाची खात्री पटवून दे." स्मित हास्य करून महिमा म्हणाली, "जशी आज्ञा स्वामी!" मग तिने कृपादृष्टी टाकताच सुवर्णराशींनी शेत भरून गेले. ते पाहून रेवण म्हणाला, "देवीमाते! तू खरोखर सत्य आहेस, येथून पुढे तू माझ्या सान्निध्यात राहून माझ्या मनातील इच्छापूर्ती करण्याची तुजपाशी प्रार्थना आहे." त्यावर महिमा म्हणाली, "मी गुप्तपणे तुमच्या सान्निध्यात राहून तुमच्या मनोकामनांची पूर्तता करेन, पण नेहमी माझ्या दर्शनाची अपेक्षा करू नये." "अवश्य देवी! आता या सुवर्णराशी अदृश्य कर!" सुवर्ण राशी अदृश्य करून महिमा गुप्त झाली. दिवसभर शेतातले काम करून रेवण संध्याकाळी घरी गेला. बैलांना गोठ्यात बांधले, चारापाणी, वैरण खायला घालून अंथरुणावर पडून आराम करीत राहिला.

दुसऱ्या दिवसाची पहाट झाली. रेवणने विचार केला, "दिवसभर उन्हात कष्ट करून देहाला व्यर्थ श्रम का द्‌यावेत?" सकाळपासून दिवस मावळेपर्यंत नुसते कष्ट! वर्षानुवर्षे हे असेच चालले आहे? आता आपल्याजवळ सिद्धी असतांना निष्कारण दैन्य का सहन करावे? परीस जवळ असतांना धनाची प्राप्ती करण्यासाठी देशांतरास जाण्याची गरज नाही. साक्षात देवलोकातली कामधेनु दारात उभी असताना ताकासाठी दारोदार याचना करण्याची आवश्यकता नाही, किंव्हा गळ्यातील माळेत चिंतामणी असतांना चिंता का करावी." अशा कल्पनाविश्वात रमून शेतात जाण्याच्या विचार रद्द केला. सूर्य डोक्यावर आला तरी रेवण झोपला आहे, हे पाहून सहनसारूक म्हणाला, "पुत्रा रेवण! आज शेतावर जायचे नाही काय?" रेवण उत्तरदाखल म्हणाला, "बाबा, शेतात जाऊन तरी काय करावे? रात्रंदिवस कष्ट करून, घाम गाळून काय प्राप्ती होते हो?" मुलाच्या या अजब उत्तराने पिता सहनसारूक चक्रावलाच, "अरे बाळा! कष्ट करून काळ्या मातीत घाम गाळल्याशिवाय धान्य कसे पिकेल? ते नाही पिकले तर खाणार काय? काळ्या आईच्या कृपेने पिकले तरच दोन घास खाऊन सुखात राहू. घामाचा अभिषेक केल्याशिवाय भूमाता प्रसन्न होत नाही. असा आळस करशील तर पोटाला फाके पडतील, उपाशी मरू आपण, जा बाळा! शेतात जाऊन कष्ट कर!" पण बाळ काही ऐकत नाही. तो युक्तिवाद करतो, "बाबा! कष्ट करून शेती पिकविण्याची काय गरज आहे? आपल्या घरात कशाची कमतरता आहे म्हणून कष्ट करावयाचे? "अरे बाळा! आपल्या गरीबाच्या घरात काय आहे? मला तुझे बोलणे समजेनासे झाले आहे, आपण रोज कांदा भाकरी, चटणी, मिरची कोरड्यास खावून दिवस काढतो आहोत." पण रेवण आत्मविश्वासाने वडिलांना म्हणाला, "बाबा, असं म्हणू नका, आपले घर; अन्न, धान्य, सुवर्णराशींनी ठासून भरले आहे. माझ्या शब्दावर विश्वास नसेल तर खरे खोटे प्रत्यक्ष पाहूनच घ्या!" तेव्हा वेड्या पोराचे खुळयागत बोल समजून तो घरात गेला, आणि पाहतो तर घर सुवर्णराशींनी भरून गेले आहे. तो आश्चर्यचकित झाला. मनात म्हणाला "हे तर नवलच घडले आहे, पुत्राचे बोल सत्य आहेत, याला वाचासिद्धी प्राप्त झाली असावी. हा नक्कीच कोणीतरी महान अवतारी असला पाहिजे. धन्य आहे!" त्यानंतर सहनसारुकाने त्याला कधी काम सांगितले नाही किंवा त्याचा शब्द अव्हेरला नाही. मुलाच्या मर्जीप्रमाणे वागू लागला. त्यांचे बुंधलं नामक गाव हमरस्त्यावर होते. येणारे जाणारे कुणी वाटसरू रात्रीच्यावेळी मुक्कामाला राहत असत. त्यांना रेवण घरी घेऊन जाई आणि जेवण देत असत, ज्या त्या पांथस्थाच्या इच्छेनुसार पंचपक्वान्ने वाढून त्यांना समाधानी करत असे. हा त्याचा नित्यकर्म झाला. यथावकाश सर्वत गाजावाजा झाला की रेवण विनामुल्य अन्नदान करीत आहे. मग अनेक गावातून लोकांच्या झुंडीच्या झुंडी भोजनासाठी येऊ लागल्या. ज्याला जो पदार्थ पाहिजे त्याला

तो पदार्थ उपलब्ध करून रेवण सर्वांना तृप्त करू लागला. त्याशिवाय, अन्न, वस्त्र, धन दान करून गरजवंतांची गरज भागवू लागला. अपंग, गोरगरीब, व्याधीग्रस्त लोक संतुष्ट होऊन आशीर्वाद देऊन निघून जात होते. त्याच्या दातृत्वाचा चांगलाच गवगवा झाला. मौखिक प्रसिद्धी होऊन चहूकडे किर्ती पसरली. सर्वजण त्याला रेवणासिद्ध नावाने ओळखू लागले.

एके दिवशी मच्छिंद्रनाथ अचानक त्या गावात वस्तीसाठी आले. धर्मशाळेत बसून श्रीगुरु ध्यानधारणा करीत असताना गावातील लोक धर्मशाळेत आले, नाथांना पाहून म्हणाले, “साधू महाराज! आपण येथे मुक्कामासाठी थांबणार असाल तर रेवणसिद्धांकडे अवश्य जाऊन यावे.” नाथ म्हणाले, “कोण हा रेवणसिद्ध? उत्तरादाखल त्यांनी रेवणसिद्धाची जन्मापासूनची कथा सांगितली, नाथांनी अंतरी शोध घेतला, त्यांना तो आपलाच सहअवतारी चमसनारायण असल्याचे दिसून आले. अधिक चौकशीसाठी त्यांनी ग्रामस्थांकडे विचारणा केली, “तुमच्या रेवणसिद्धाचे गुरु कोण आहेत?” भोळे भाबडे गावकरी म्हणाले, “आम्हाला काही माहिती नाही बाबा!” हे ऐकून थोड्यावेळ स्तब्ध झाले, मनाशी काही विचार केला, मग विविध प्रकारच्या पक्ष्यांना बोलवू लागले. पक्षी आले, त्यांना खाद्य दिले आणि नाथांनी जा म्हणताच ते भुर्रकन उडून गेले. नंतर त्यांनी वन प्राण्यांना बोलाविले. हरीण, ससे, कोल्हे, लांडगे, वाघ, सिंह, चित्ते असे सर्व जातीचे, भिन्न स्वभावाचे पशु, गावातील मनुष्यवस्तीत घुसून धर्मशाळेत आले आणि नाथाजवळ येऊन बसले. नाथांनी त्यांना गोंजारीत खाद्य भरविले. तृणभक्षक आणि मांसभक्षक पशु एकमेकांतील वैरभाव विसरून एकमेकांना खेटून बसलेले गावकऱ्यांना पहावयास मिळाले. गावातील लोकांची पाचावर धारण बसली होती. पण हिंस्र श्वापदाने माणसांवर तर नाहीच पण शेजारीच बसलेल्या तृणभक्षकांवर सुद्धा हल्ला केला नाही. लोक मच्छिंद्रनाथांना महापुरुष म्हणू लागले. अनेक दिवस पशुपक्षी नित्यनियमाने नाथांकडे येत आणि भक्ष खाऊन शांतपणे जात होते. या गोष्टींचा फारच गवगवा झाला आणि रेवणसिद्धांच्या कानावर ही बातमी पोहोचली, लोक सांगू लागले, “रेवणमहाराज, आपल्या गावातील धर्मशाळेत एक महान योगी आला आहे, त्याची अद्भुत लीला काय सांगावी! पशुपक्षी त्यांच्या भेटीसाठी येतात, पाळीव प्राण्यांसारखी शेपूट हलवत निर्भयपणे अंगाखांद्यावर बसतात. आम्ही सांगतोय ते खरे वाटत नसेल तर स्वतः खात्री करून घ्यावी!” हे ऐकून खरा चमत्कार काय आहे तो पाहण्यासाठी रेवण तिथे गेला, तो अजब प्रकार पाहून रेवणदेखील अचंबित झाला. मनात म्हणाला, “आश्चर्य आहे! एकमेकांतील वैरभाव विसरून सर्व प्राणी निर्भय होऊन शांतपणे एकत्र कसे बसतात? त्यांच्यावर हुकुमत गाजवणारा हा कोण महापुरुष आहे, ते शोधले पाहिजे.” रेवण घरी जाऊन एकांतात बसला, श्रीदत्तगुरूंनी दिलेल्या मंत्राचे पठाण करताच सिद्धी प्रकट होऊन विचारू लागली, “स्वामी, आपण मला कशासाठी बोलाविले आहे?” “हे कृपासरीते सिद्धी देवी! केवळ तुझ्या कृपाप्रसादाने मी अन्नदान करून लोकांना संतुष्ट करीत आहे. तसे आता पशुपक्ष्यांना संतुष्ट करावयाची इच्छा आहे, चराचरातील सर्व प्राणी आपले एकमेकांविषयी असलेले वैर विसरून एकत्र नांदले पाहिजेत.

“स्वामी! प्रखर ब्रम्हज्ञानी योग्यांशिवाय पशुपक्ष्यांना एकमेकातील वैरभाव विसरायला लावण्याची शक्ती इतर कुणातही नाही. जो स्थावर आणि जंगमात, जळी, स्थळी, पाताळी सर्वांच्या ह्रदयात वास करून आहे, त्याला अद्वैताचे ध्यान आहे, तोच प्राणीमात्रात ऐक्य घडवू शकतो. पाणी पाण्यात मिसळले की भेद राहात नाही. ते तर एकरूपच होते. तसा ब्रम्हवेत्त्यामध्ये आणि चराचरांमध्ये भेदाभेद नसतो. ते एकरूपच झालेले असतात. असा ज्ञानी सर्व जगताला आप्त मानतो आणि सृष्टीतील सर्व सजीवही त्याला आपलाच सखा, सोयरा मानतात. त्यासाठी आपण स्वतः ब्रम्हवेत्ता

झाल्याशिवाय आपल्या इच्छेप्रमाणे होणे शक्य नाही." हे तिचे उपदेशपर बोल ऐकून रेवण तिला म्हणाला, "हे महिमा सिद्धी देवी! तू मला ब्रम्हवेत्ता करावेस." त्यावर देवता म्हणाली, "श्री दत्त महाराजांसारखे समर्थ आपले गुरु असताना, त्यांची प्रार्थना करूनच आपण ब्रम्हपरायण व्हावे, त्यांची कृपा झाल्यास पशुपक्षीच नव्हे तर साक्षात देव सुद्धा आपली आज्ञा मानतील आणि आपल्या चरणी लीन होतील. आपणसुद्धा ब्रम्हांडावर हुकुमत गाजवाल." असे सांगून सिद्धी गुप्त झाली.

ब्रम्हपरायण होण्याच्या दृढ निश्चयाने, सर्वसंग परित्याग करुन रेवण अरण्यात गेला. ज्या ठिकाणी श्रीदत्तात्रेय भेटले होते त्या ठिकाणी जाऊन दत्त नामाचा जप करीत, भेटीची प्रतीक्षा करीत राहिला. श्रीदात्तांच्या वियोगाने व्याकूळ होऊन त्याने अन्नपाणी वर्ज्य केले. झाडावरून पडझड झालेली पाने वाऱ्याच्या झोताने मुखापर्यंत आली तरी तो ती मुखात जाऊ देत नसे. दिवसेंदिवस देह शुष्क होऊन काष्ठवत झाला, श्रीगुरूंच्या भेटीसाठी उग्र तप सुरु झाले. त्याची ती अवस्था पाहून मच्छिंद्रनाथ मनाशी म्हणाले, "बरे झाले एकदाचा सुपंथाला लागला पण याचा गुरु कोण हे मात्र समजले नाही. असा कसा याचा गुरु? शिष्याच्या गळयाला फास पडला तरी हा गुरु कुठल्या अध्ययनात गुंतून पडला आहे? असा कसा निर्दय गुरु!" नाथांनी अनेक गावकऱ्यांशी चर्चा केली आणि रेवणसिद्धाची माहिती घेतली. गावकरी म्हणाले, "रेवण फार परोपकारी आहे. त्याच्यात स्वार्थाचा लवलेशही नाही. असंख्य लोकांना अन्नदान करून त्यांचा अंतरात्मा याने तृप्त केला आहे. कित्येकांना धनदान देऊन त्यांच्या दारिद्र्याचे, त्यांच्यावर आलेल्या संकटांचे याने निवारण केले आहे. गोरगरीब जनतेचे दुःख त्यांना पाहवत नसे. तो आमचा दयाळू पालक होता." ते ऐकून मनाशी तर्क केला, "गुरुकृपेने याला नक्कीच सिद्धी प्राप्त झाली असावी, तरी कोणती सिद्धी याला वश आहे याचा शोध घेतला पाहिजे.' मग त्यांनी अष्टसिद्धींना पाचारण करून त्यांना विचारणा केली. "अष्टसिद्धी देवतांनो! रेवणच्या सेवेत आपल्यापैकी कोण आहे? ते कृपा करून मला सांगा!" तेव्हा महिमा सिद्धी म्हणाली, "मच्छिंद्रनाथ, श्रीदत्तांनी त्याला दिलेल्या सिद्ध मंत्रामुळे मी त्याला सहाय्यभूत झालेली आहे." श्री दत्तात्रेय याचे गुरु आहेत हे कळल्यावर नाथांनी विचार केला, "रेवण हा तर माझा गुरुबंधू आहे. सीतेच्या मुक्ततेसाठी जसे अंजनीसुत मारुतीने प्रभू रामाला सहाय्य केले, वानर वीरांनी गोपाळांचे अवतार घेऊन श्रीकृष्णाला सहाय्य केले त्याप्रमाणे याचे हित जपण्यसाठी मी याला मदत केलीच पाहिजे. साक्षात चमसनारायण हा रेवणसिद्धाच्या अवतारात असलेला माझा भाऊच आहे. त्याला सहाय्यभूत होणे हे माझे कर्तव्यच आहे. अशा विचारात नाथ वायूवेगाने गिरनार पर्वतावर गेले. गुरुदेव दत्तांच्या चरणांवर मस्तक ठेवून त्यांना वंदन केले. रेवणसिद्धाची कहाणी निवेदन करून शेवटी म्हणाले, "गुरुमाऊली! आपण साधकांचे हित विकसित करणारे सूर्यच आहात. चमस अवतार रेवण आपल्या भेटीसाठी दारूण तप करीत आहे. तरी त्याच्यासाठी आपण वायूवेगाने चालावे आणि त्याच्यावर कृपा वर्षाव करावा. एका सिद्धीने त्याच्या गळयाला फास आवळला आहे. जेथे तुमची भेट झाली त्याच स्थानावर अन्नपाणी वर्ज्य करून प्राण कंठाशी आणून तो बसला आहे. अस्थीपंजर होऊन त्याचे नेत्र पांढरे फटक पडले आहेत. तरी दयावंत माऊली, बालकावर इतकी अवकृपा बरी नव्हे. परिसाने सुवर्ण निर्मितीची शक्ती सोडू नये, सूर्याने अंधःकराचे नाश करण्याचे कार्य केलेच पाहिजे, तसे आपणच आमचे त्राता आहात, त्यामुळे आम्हाला आपल्या पंखाखाली घेतलेच पाहिजे. आपण आधार दिला नाहीत तर रेवणची आहुती पडेल आणि आपली कृपा झाली तर अमृतप्राशन केल्याप्रमाणे अमरत्व मिळेल त्याला. दयाळा! आता दया करा." मच्छिंद्रनाथांच्या प्रार्थना युक्तीवादाने श्रीदत्त प्रसन्न झाले. व्यानास्त्र प्रयोगाने दोघेही रेवणसिद्धा जवळ गेले. इंद्र वाचस्पती, हरि हर,

द्रोण मंदराचल, मारुती मरूत यांच्या प्रमाणे मच्छिंद्र दत्त भासत होते. रेवणाची दुरावस्था पाहून दयासागर श्रीदत्त फार कळवळले. गाईने वासराला प्रेमाने चाटावे किंवा आईने बाळाला पोटाशी धरावे त्याचप्रमाणे श्रीदत्तांनी रेवणला आपल्या बाहुपाशात घेतले. रेवणाने त्यांना वंदन केले आणि आश्रू ढाळीत त्यांना बिलगून म्हणाला, “आज मला माझी गुरु माऊली भेटली.” गालावरून ओघळणारे आश्रू पुसून दत्तगुरूंनी त्याच्या माथ्यावर हात ठेवला. कानात गुरुमंत्र सांगितला. त्याच्यावर कृपा केली आणि त्याला सज्ञान केले. परिणामी त्याचे अज्ञान नाहीसे झाले आणि ब्रम्हसाक्षात्कार झाला. हृदयातील ज्ञानज्योतीने द्वैतभावनेचा अंधार पूर्णपणे नाहीसा झाला. श्रीदत्तांनी वज्रशक्तीची विभूती त्याच्या कपाळावर लावून त्यांस शक्ती प्रदान केली.

रेवणनाथाला घेऊन श्रीदत्त गिरनार पर्वतावर गेले. विद्याभास शिकून पारंगत केले. ब्रम्हज्ञानाचे धडे दिले. तेव्हा त्याला साक्षात्कार झाला की आपल्या देहात असणारी चैतन्यशक्ती ही सर्व चरचरात भरून राहिली आहे. गुरुजींमध्ये ही तेच चैतन्य आहे. मी गुरु मध्ये आणि गुरु माझ्यात आहेत. चराचर आणि मी वेगळे नसून आम्ही एकच आहोत. ब्रम्हज्ञान दृष्टी प्राप्त झाल्यानंतर पशु, पक्षी, वनचर त्याच्या जवळ येऊ लागले. वैरभाव सोडून त्याची आज्ञा पळू लागले गुरुदेव दत्तांनी त्याला सर्व विद्या भांडार सुपूर्द करून त्याला मच्छिंद्रा सारखे बलवान केले. कान फाडून नाथपंथाची दीक्षा दिली. मग मच्छिंद्रनाथासह त्याला घेऊन मार्तंड पर्वतावर गेले. नाग अश्वत्थ वृक्षाची पूजा करून देवतांचे आशीर्वाद प्राप्त करून दिले. साबरी काव्यरचना करवून घेतली, गिरनार पर्वतावर उद्यापन केले. तेव्हा सर्व देवदेवतांना निमंत्रित केले होते, चार दिवस सोहळा चालला. देवांनी प्रसन्न होऊन रेवणनाथाला वरदाने दिली. त्यानंतर श्रीगुरुदत्तांनी त्याला तीर्थयात्रेला पाठविले.

तीर्थयात्रा करीत रेवणनाथ माणदेशातील ‘वीट’ या गावात मुक्कामसाठी गेले. त्या गावात सरस्वती नावाचा एक ब्राम्हण राहत असून त्याच्या पत्नीचे नाव जान्हवी असे होते. दोघांचे एकमेकांवर अलोट प्रेम होते. लोह चुंबक, चंद्र सूर्य यांच्याप्रमाणे सरस्वती जान्हवी ही जोडी होती. पाण्याशिवाय मासा राहत नाही तसे ते दोघेही एकमेकांशिवाय क्षणभरही राहत नव्हते. नाग नागिणीसारखी त्यांची अतूट प्रीती होती. प्रपंच सुखाचा चालला होता. पण संतान सुख प्रारब्धात नव्हते. सहा मुले जन्मली पण जन्मल्यानंतर सात आठ दिवसात बाळांचा मृत्यु होत असे. आता सातवे मूल झाले आहे. बारा दिवस झाले तरी ते जिवंत होते त्यामुळे आता हे मारणार नाही असे वाटून ब्राम्हणाला खूप आनंद झाला, तो पत्नीस म्हणाला, “अगं जान्हवी! आपले सहा पुत्र काळाने सातव्या आठव्या दिवशी ओढून नेले पण हा सातवा पुत्र मात्र दीर्घायू दिसतो. आज बारावा दिवस! तरी हा जिवंत आहे. आता याला काळाचे भय नाही. हा वाचला म्हणायचा.” याच आनंदात त्यांनी बारसे केले. पंचपक्वान्नांचे जेवण केले. सर्व आप्तजन पक्वांनावर ताव मारीत होते. त्यावेळी योगायोगाने नेमके रेवणनाथ तेथे येऊन पोहोचले आणि ‘अल्लख निरंजन’ अशा दमदार आवाजात साद घातली. वाड्याच्या दाराशी एक साधू भिक्षा मागत असल्याचे ब्राह्मणाने आतूनच पाहीले. पंक्तीला वाढायचे काम तसेच सोडून तो बाहेर आला. बाहेर येता येता बारकाईने न्याहाळताना नाथांचा तेजस्वी चेहरा आणि गौरकांती पाहून हे कुणी अवतारी तपस्वी असल्याचे त्याला जाणविले, लगबगीने त्याने त्यांच्या चरणांवर आपले मस्तक ठेवले आणि विनंती केली, “योगीराज! आज माझ्या घरी बारसे सोहळा आजरा होत आहे. हे बारसे घालण्याचा योग प्रथमच आला आहे. अशा आनंदाच्या प्रसंगी आपण वाड्यात यावे, माझी गरीबाची इच्छा डावलू नये, अनाथाला सनाथ करावे. मी गरीब ब्राम्हण आहे अतिथींची सेवा करण्यात कुचराई झाली. संसार स्वार्थाने वागलो. फक्त नावाचे ब्राम्हणत्व काही कामाचे नाही.

आज आपल्या पदस्पर्शाने आम्हाला पावन करावे.” असे बोलून तो अतिशय विव्हळ झाला आणि वारंवार त्यांच्या चरणांवर माथा ठेवू लागला. नाथ म्हणाले, “ब्राम्हणा! तुझ्यासारख्याला असे वर्तन शोभणारे नाही.” त्याच्या भावनेचा आदर करून नाथ वाड्यात गेले. ब्राम्हणाने स्वहस्ते भोजनपत्रात अन्नपदार्थ भरून त्यांना वाढले, नाथांचे भोजन होईपर्यंत ताटाजवळ बसून लक्ष दिले. पंगतीची व्यवस्था दुसऱ्यावर सोपवून स्वतः नाथांपासून दूर झाला नाही. साखरेला मुंगी चिकटून राहावी तशी त्याची अवस्था नाथांच्या व्यक्तिमत्वाच्या प्रभावाने झाली. सर्व ब्राम्हण भोजन करून निघून गेले. सरस्वती ब्राम्हणाने हात जोडून, नम्रतेने नाथांना विनंती केली, “महाराज! आज येथेच मुक्काम करावा, उद्या प्रातःकाळी आपण जावे. आज आपली सेवा करण्याचे भाग्य आम्हास द्यावे,” त्याच्या अति प्रेमळ आग्रहाला बळी पडून नाथांनी तेथे मुक्काम करण्याचे मान्य केले. ब्राम्हणाने वेगळया खोलीत अंथरून घालून एकांतात त्यांना आराम करावयास लावला. त्यांना निद्रा लागल्यानंतर स्वतः भोजन करून, सर्व आवराआवरी करून त्वरेने पुन्हा नाथांजवळ गेला. सूर्यास्तसमयी नाथ उठून बसले, ब्राम्हणाने वंदन करून फराळ करण्यासाठी आग्रह केला. तेव्हा नाथ म्हणाले, “दुपारी भरपेट भोजन झाल्याने काही खाण्याची इच्छा नाही.” असे म्हणून नित्यनेम आवरून पुन्हा पहुडले. तो त्यांचे पाय चेपू लागला. मध्यरात्रीच्या निरव शांततेत त्याची पत्नी रडत त्याला हाका मारीत होती, बाळाची प्रकृती अत्यवस्थ झाल्याचे तिने सांगितले, तेव्हा तो तिला म्हणाला, “प्रारब्धात असेल तसे घडेल, आपले भाग्यच जर सदोष असेल तर, आपल्याबाबतीत काही चांगले घडण्याची अपेक्षाच अवास्तव आहे. पूर्व जन्मीचे पातक या जन्मी फेडत असू! आता निदान या अतिथीदेवाची तरी निद्रा भंग करू नकोस.” असे बजावून तो परत जाऊन नाथांचे पाय चेपू लागला.

उत्तररात्री यमदूतांनी बाळाचे प्राण हरण केले. निष्प्राण बालकाचा देह पाहून मातेच्या हृदयात आग भडकली, रडण्याचा ध्वनी बाहेर जाऊ नये म्हणून तिने तोंडात बोळा घालून तोंड हाताने दाबून धरले. तरीही क्षीण आवाजात रडणे सुरु आहेच. प्रातःकाळाचा समय होऊन नाथांना जाग आली. तेव्हा स्फुट अस्फुट रुदन स्वर त्यांच्या कानावर आलेच. त्यांनी विचारले कोण रडते आहे?” “तान्हया बाळाचे जिव कासावीस होत असल्याने त्याची आई रडत आहे.” नाथ म्हणाले, “बाळाला माझ्यासमोर आण पाहू!” ब्राम्हणाने जान्हवी जवळ जाऊन पहिले असतां त्याला बाळ मृत झाल्याचे दिसले. त्याने नाथांना सांगितले, “महाराज! बालक मृत झाले!” ते ऐकून नाथांना यमाचा राग आला. संतप्त होऊन ते म्हणाले, “मी या ठिकाणी उपस्थित असतांना बालकाचे प्राण हरण करायचे यमाचे धाडस कसे झाले? त्या काळ यमालाच मी नष्ट करेन. त्या बाळाचा देह माझ्याजवळ आण!” ब्राम्हणाने मृतदेह त्यांच्या समोर आणून ठेवला. खेळून शांत निद्रेत पहुडल्यासारखे दिसणारे ते गोजिरवाणे बाळ पाहून नाथांना फार वाईट वाटले. त्यांनी ब्राम्हणाला विचारले, “तुला एवढे एकच बालक झाले होते काय? त्यावर सरस्वती खिन्न होऊन म्हणाला, “महाराज! हे आमचे सातवे अपत्य आहे. जन्मल्यानंतर पाच सात दिवसात माझी बाळं मृत होतात. हेच बाळ बारा दिवसापर्यंत जगले होते. सर्व बालके मुर्त्यूमुखी पडली, असो! आमचे भाग्य फुटके, त्याला उपाय नाही. घडणारे घडून गेले परंतु त्यामुळे आपल्या सेवेत बाधा निर्माण झाली. आपल्या सेवेने तेवढाच पुणसंचय होईल. झालेल्या गोष्टींसाठी आपण दुःखी होऊ नये, हा आमचा दुर्दैवाचा भाग आहे.

नाथांनी अमर मंत्र जपून विभूती बाळाला लावली आणि म्हणाले, “ब्राम्हणा! तीन दिवस हा मृत देह सांभाळून ठेव. हा आहे तसाच सतेज राहील, कोमेजणार नाही. मी स्वतः यमलोकात जाऊन सातही बाळांना परत घेऊन येतो.” तातडीने व्यानास्त्र जपून नाथ अतिवेगाने गेले. नाथ तडक यमपुरीतच धडकले. त्यांना पाहताच यमराज स्वागतासाठी उठून उभा

राहिला सुवर्णासनावर बसवून त्यांची षोडशोपचारे पूजा केली. मग नम्रपणे विचारले, “योगीराज, कोणत्या कामानिमित्त येणे केलेत, ते कृपया सांगावे.” नाथांनी विचारणा केली, “यमराज, वीट गावात सरस्वती नामक ब्राम्हणाच्या घरी मी उपस्थित असताना त्या बाळाचे प्राण आपण कसे हरण केलेत? ठीक आहे, कदाचित तुमच्या कर्तव्याचा भाग म्हणून ही तसे घडले असावे. परंतु तो प्राण मला परत करावा. तसेच त्याचे अगोदरचे सहा पुत्र कुठे आहेत, ते सुद्धा मला द्यावेत; आणि तसे जर आपण केले नाहीत तर माझा क्रोधाग्नी तुम्हाला भस्म करेल.

यमराजाला नाथांच्या क्षमतेची, योग्यतेची आणि तपःसामर्थ्याची चांगलीच जाणीव होती. त्यांनी विचार केला, “यांच्याशी संगर्ष करण्याऐवजी याला सरळ कैलासात श्रीशिवाकडे पाठवून देणे श्रेयस्कर ठरेल.” मग तो नाथांना म्हणाला, “रेवणनाथ माझे म्हणणे लक्षपूर्वक ऐका; नाभीकुमार ब्रम्हा, हरी आणि हर यांच्या नियंत्रणात सृष्टीचा कारभार चालतो. ब्रम्हा उत्पत्तिकर्ता, श्री विष्णू पालन, पोषण आणि रक्षणकर्ता श्रीशिव लयकर्ता असे आहेत. त्याप्रमाणे श्रीशिवाच्या आज्ञेनुसार आम्ही विनाशाचे काम करतो, आज्ञापालन करणे एवढ्यापुरतीच आमची भूमिका मर्यादित आहे. आम्ही एकप्रकारे जग् निर्मात्यांची चाकरी करीत आहोत. कुणाला जन्माला घालणे, तारणे, मारणे यापैकी आमच्या हातात काही नाही, आम्ही केवळ हुकुमाचे ताबेदार, हुकुमाचे पालनकर्ते आहोत. तुमच्या मागणीचा विषय श्रीशिवाच्या अखत्यारीतला असल्याने आपण त्यांच्याकडे गेल्यास तुमचे काम होईल. आणखी एक खास गोष्ट सांगतो; भोळया शंकराची आराधना करून आपण सातही पुत्र न्यावेत. त्यांचे आत्मे तिथेच आहेत. तरी आपण चातुर्याने काम करून यशस्वी व्हावे. क्षयकर्ता श्रीशिव असल्याने आपणांसह सर्वजण जाणत आहात, म्हणून मज गरिबावर अकारण राग धरून काय उपयोग? माझ्या हातात असते तर मी नक्की आपणांस मदत केली असती.” यमराजाचे स्पष्टीकरण रेवणनाथांना पटले.

“यमराज, आपले म्हणणे सत्य आहे, हे श्रीशिवाचे काम आहे. तरी मी आता असाच कैलासावर जातो, त्यांना मी विनंती करेन आणि प्रसंग पडल्यास वैरसुद्धा करेन, येतो मी.” असे म्हणून रेवणनाथ कैलासावर निघाले. त्यामुळे यमराजांनी मात्र सुटकेचा निःश्वास सोडला कारण प्राणावर ओढवलेले संकट कैलासावर घोंगावत गेले होते.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने धार्मिक वृत्तीचा पुत्र लाभून तो पिढ्यानपिढ्यांचा उद्धारकर्ता असेल.